**मुंबई येथील राजभवन व परिसरातील सर्व अभियांत्रिकी कामे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या पुणे येथील यंत्रणेऐवजी मुंबई येथील यंत्रणेकडे हस्तांतरित झाल्याने पदे वर्ग करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२०/प्र.क्र.६३/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १९ नोव्हेंबर, २०२०

**संदर्भ:-** १) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.बीडीजी-२०२०/प्र.क्र.१३२/इमारती-३, दि.२१ मे, २०२०
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांचे क्र.अअ/मुंमं/ का.३(तांत्रिक)/ राजभवन/४३२०, दि. २२ सप्टेंबर, २०२० रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये मुंबई येथील राजभवन व परिसरातील सर्व अभियांत्रिकी कामांचे मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे यांच्या अंतर्गतच्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्याकडून करण्यात येणारे कार्यान्वयन मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई यांच्या अंतर्गतच्या कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांच्याकडे हस्तांतरित करण्यात आले आहे. सबब, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांच्याकडील मुंबई येथील राजभवन व परिसरातील सर्व अभियांत्रिकी कामांचे कार्यान्वयन करणारी पदे वजा करून वेतन व भत्ते अदा करण्याच्या दृष्टीने कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांच्याकडील नियमित आस्थापनेकरिता (सद्य:स्थितीत मंजूर असलेल्या संवर्गनिहाय पदांच्या संख्येच्या अतिरिक्त स्वरूपात) व आमदार निवास उपविभाग, मुंबई यांच्याकडील रूपांतरित अस्थायी आस्थापनेकरिता अतिरिक्त स्वरूपात वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे या कार्यालयाकडील मुंबई येथील राजभवन व परिसरातील सर्व अभियांत्रिकी कामांचे कार्यान्वयन करण्यासाठीची नियमित आस्थापनेवरील आकृतीबंधामधील मंजूर खालील नमूद ०६ पदे (सद्य:स्थितीत मंजूर असलेल्या संवर्गनिहाय पदांच्या संख्येच्या अतिरिक्त स्वरूपात) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांच्याकडे वर्ग करण्यास तसेच रूपांतरित अस्थायी आस्थापनेवरील मजुर संवर्गाचे एक पद आमदार निवास उपविभाग, मुंबई यांच्याकडे अतिरिक्त स्वरूपात वर्ग करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांचेकडे वर्ग करावयाची पदे** | **आमदार निवास उपविभाग, मुंबई यांचेकडे वर्ग करावयाची पदे** |
|---|---|---|---|
| १. | शाखा अभियंता | ०१ | ० |
| २. | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ०२ | ० |
| ३. | शिपाई | ०२ | ० |
| ४. | गवंडी | ०१ | ० |
| ५. | मजूर | ० | ०१ |
| | **एकूण** | **०६** | **०१** |

२. उपरोक्त नमूद कर्मचा-यांचा वेतन व भत्तेविषयक खर्च सार्वजनिक बांधकाम विभागाचे वित्तीय लेखाशीर्ष -मागणी क्र. एच-६, २०५९ सार्वजनिक बांधकामे, ८० सर्वसाधारण कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग मुंबई २०५९ ०८७५-०१ वेतन॰ या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा, याबाबत संबंधित कोषागार कार्यालयाने वेतन आणि आहरण व संवितरण सुलभतेने होण्याच्या अनुषंगाने योग्य ती कार्यवाही करावी. त्यानुसार नियमित आस्थापनेवरील ०६ पदांचा (शाखा अभियंता-०१, स्थापत्य अभियांत्रिकी सहायक-०२, शिपाई-०२, गवंडी-०१) समावेश सेवार्थ प्रणालीमध्ये कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई यांचा डी.डी.ओ.क्र. ७१०१९०३६९६ मध्ये आणि रूपांतरित आस्थापनेवरील ०१ पदाचा (मजूर-०१) समावेश सेवार्थ प्रणालीमध्ये अधीक्षक, आकाशवाणी आमदार निवास उपविभाग यांचा डी.डी.ओ.क्र. ७१०१००३४२६ मध्ये करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२०१११९१३२६०४९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2020.11.19 13:28:04 +05'30'

**( वि. नि. ढमाळ )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति-**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
४. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
५. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

६. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
९. महालेखाकार (लेखा व हकदारी)-॥ , महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. सर्व सह सचिव, उप सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सर्व अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई , पुणे
१३. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई, पुणे
१४. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, मुंबई
१५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे
१६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१७. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
१९. जिल्हा कोषागार / उपकोषागार अधिकारी, मुंबई / पुणे.
२०. कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).